**भा.व.से. अधिकाऱ्यांनी लोकपाल व लोकआयुक्त अधिनियम, २०१३ अंतर्गत मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे सादर करण्यास मुदत वाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: आयएफएस-२०११/प्र.क्र.४६/फ-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १६ जुलै, २०१५

वाचा :-

१) केंद्रिय कार्मिक व प्रशिक्षण विभाग, नवी दिल्ली यांची दि. २६/१२/२०१४ रोजीची अधिसूचना.
२) केंद्रिय पर्यावरण, वने तथा जलवायू परिवर्तन मंत्रालयाचे दि. १०/०९/२०१४ चे पत्र.
३) महसूल व वन विभागाचे समक्रमांकाचे दि. २९/०९/२०१४ व दि. ०९/०२/२०१५ ची पत्रे.
४) केंद्रिय कार्मिक व प्रशिक्षण विभाग, नवी दिल्ली यांचे ज्ञापन क्र.४०७/१२/२०१४-एव्हीडी-IV-बी, दिनांक १८.०३.२०१५
५) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, समक्रमांक दि. २३/०४/२०१५
६) केंद्रिय कार्मिक व प्रशिक्षण विभाग, नवी दिल्ली यांचे ज्ञापन क्र.४०७/१२/२०१४-एव्हीडी-IV-बी, दिनांक २५.०४.२०१५
७) केंद्रिय कार्मिक व प्रशिक्षण विभाग, नवी दिल्ली यांचे अ.शा.पत्र क्र.४०७/१२/२०१४-एव्हीडी-IV-बी, दिनांक ३०.०४.२०१५

**शासन परिपत्रक**

लोकपाल व लोकआयुक्त अधिनियम, २०१३ मधील कलम ४४ नुसार राज्यातील भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांनी त्यांची व त्यांच्या कुटुंबातील सदस्यांची (पती/पत्नी व अवलंबून असणारी मुले) दिनांक १ ऑगस्ट, २०१४ रोजीची स्थिती दर्शवणारी मत्ता व दायित्वाची विवरणपत्रे दिनांक १५.९.२०१४ पर्यंत सादर करण्याची तरतूद सदर नियमामध्ये करण्यात आली होती. सदर मत्ता व दायित्वाची विवरणपत्रे सादर करण्यासाठी दिनांक ३१.१२.२०१४ पर्यंतची मुदतवाढ देण्यात आली होती. तदनंतर केंद्र शासनाने लोकपाल व लोकआयुक्त अधिनियम २०१३ मधील तरतूदीनुसार सादर करणे आवश्यक असलेली मत्ता व दायित्वांची विवरण पत्रे सादर करण्यास दिनांक ३०.०४.२०१५ पर्यंत मुदत वाढविली. त्यानुसार उक्त संदर्भाधीन परिपत्रक क्र.५ अन्वये राज्यातील भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांनी त्यांची मत्ता व दायित्वांची दिनांक ०१.०८.२०१४ ची स्थिती दर्शविणारी विवरणपत्रे सदर नियमामध्ये विहित केलेल्या कार्यपध्दतीने दिनांक ३०.४.२०१५ पर्यंत सादर करण्यास कळविले होते.

२. केंद्र शासनाने आता उक्त संदर्भ क्र. ६ मध्ये नमूद दि. २५/०४/२०१५ च्या कार्यालयीन ज्ञापनाअन्वये तसेच संदर्भ क्र. ७ मध्ये नमुद दि. ३०/०४/२०१५ च्या अर्धशासकिय पत्रान्वये (प्रत संलग्न) लोकसेवक (मत्ता व दायित्वाचे विवरण पत्र सादर करणे व विवरण पत्रे दाखल करण्यामध्ये सूट देण्यासाठी मत्तांची मर्यादा) नियम २०१४ मध्ये सुधारणा केल्याचे कळविले असून त्यानुसार मत्ता व दायित्वांची वार्षिक विवरण पत्रे सादर करण्याची मुदत दि. १५/१०/२०१५ पर्यंत वाढविण्यात आल्याचे कळविले आहे.

३. उक्त वस्तुस्थिती विचारात घेता लोकपाल व लोकआयुक्त अधिनियम, २०१३ नुसार मत्ता व दायित्वांची विवरण पत्रे सादर करण्यासंदर्भात सर्व भारतीय वनसेवेतील अधिकाऱ्यांनी खालील सूचनानुसार कार्यवाही करावी.

i. महाराष्ट्र संवर्गातील भारतीय वन सेवेतील सर्व अधिका-यांनी **दिनांक ०१.०८.२०१४ ची स्थिती दर्शविणारी** त्यांची स्वत:ची व त्यांच्या कुटुंबातील सदस्यांची (पत्नी/पती व अवलंबुन असणारी मुले/मुली) मत्ता व दायित्वांची विरणपत्रे **दिनांक १५.१०.२०१५ रोजी किंवा त्यापूर्वी सादर करावीत.**

ii. महाराष्ट्र संवर्गातील भारतीय वन सेवेतील सर्व अधिका-यांनी त्यांची स्वत:ची व त्यांच्या कुटुंबातील सदस्यांची (पत्नी/पती व अवलंबुन असणारी मुले/मुली) **दिनांक ३१.०३.२०१५ रोजीची स्थिती दर्शविणारी** मत्ता व दायित्वांची वार्षिक विवरणपत्रे **दिनांक १५.१०.२०१५ रोजी किंवा त्यापूर्वी सादर करावीत.**

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०७१६११२४५०१९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.07.16 11:27:45 +05'30'

**(वीरेंद्र तिवारी)**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत:**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बलप्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
४. मुख्य सचिव यांचे उप सचिव
५. महाराष्ट्र संवर्गातील सर्व भावसे अधिकारी
६. कार्यासन (फ-७) संग्रहार्थ /निवड नस्ती